**राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१७-१८ मधील अखर्चीत ₹ २८.३३ कोटी निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षी विनियोगात आणण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राकृवि ०८१७/प्र.क्र. ९४/१४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १९ जुलै, २०१८

<u>वाचा :</u>

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. ०३१७/प्र. क्र.१८/राकृवियो कक्ष, दि. १३.०४.२०१७
२. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-१/२०१७-आरकेव्हीवाय, दि. १५.०५.२०१७
३. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१७ आरकेव्हीवाय/३, दि. १६.०६.२०१७
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०३१७/प्र.क्र.२३/राकृवियो कक्ष, दि.०३.०७.२०१७
५. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०८१७/प्र.क्र. ९४/राकृवियो कक्ष, दि.०३.१०.२०१७
६. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१७-आरकेव्हीवाय/३, दि.३१ जानेवारी, २०१८
७. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. राकृवि ०८१७/प्र.क्र. ९४/राकृवियो कक्ष, दि.२२.०३.२०१८
८. कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. १-१५/२०१७-आरकेव्हीवाय/२, दि.२८ मार्च, २०१८
९. वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
१०.कृषि व सहकारीता विभाग, केंद्रिय कृषि मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. ७-३/२०१८-आरकेव्हीवाय, दि. ०२.०५.२०१८

<u>**प्रस्तावना :**</u>

राष्ट्रीय कृषि विकास योजना (राकृवियो) केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणाच्या अर्थसहाय्याने राबविण्यात येत आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेस सन २०१७-१८ करिता अनुसूचित जाती प्रवर्गासाठी केंद्र हिस्याचा ₹४१.९६ कोटी निधीचे नियतवाटप मंजूर केले होते व त्यापैकी प्रत्यक्ष एकूण ₹ ३८.२६ कोटी निधी राज्यास उपलब्ध करुन दिला होता, आणि त्यापैकी केंद्र हिस्याचा ₹ २१.२६ कोटी व समरुप राज्य हिस्याचा ₹ १४.६६ कोटी निधी संदर्भ क्र. ५, व ७ येथील शासन निर्णयान्वये आयुक्त (कृषि) यांना वितरित करण्यात आलेला आहे.

सन २०१७-१८ मध्ये केंद्र शासनाने प्रत्यक्ष वितरीत केलेल्या केंद्र हिस्स्याच्या ₹ ३८.२६ कोटी निधीपैकी ₹ १७ कोटी निधी दि. ३१/०३/२०१८ रोजी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झाल्याने तो वितरीत करता आला नाही. सबब, केंद्र हिस्याच्या ₹ १७ कोटी व राज्य हिस्स्याच्या ₹ ११.३३ कोटी असा एकूण ₹ २८.३३ कोटी निधीचे वितरण अद्याप बाकी होते. संदर्भाधिन दि. २ मे, २०१८ रोजीच्या पत्रान्वये सदर अखर्चीत निधी पुनर्जिवित (Revalidation) करुन चालू वर्षात विनियोग करण्यास केंद्र शासनाने मान्यता दिली आहे. त्यानुषंगाने केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून एकूण ₹ २८.३३ कोटी निधी राकृवियो अंतर्गत मंजूर प्रकल्पांवर चालू वर्षामध्ये खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०१७-१८ मधील राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत मंजूर प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून ₹ २८.३३ कोटी निधी (रुपये अठ्ठावीस कोटी तेहतीस लाख फक्त) सन २०१८-१९ या वर्षात पुनर्जिवित करुन आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे, सदर निधीचे केंद्र व राज्य हिस्याचे विवरण पुढीलप्रमाणे-

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ. क्र. | योजनेचे नाव | अनुसूचित जाती प्रवर्ग | | एकूण |
|---|---|---|---|---|
| | | राज्य हिस्सा (४०%) | केंद्र हिस्सा (६०%) | |
| १. | राष्ट्रीय कृषि विकास योजना | १७.०० | ११.३३ | **२८.३३** |

२. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती करिता वितरीत केलेला केंद्र हिस्याचा ₹ १७.०० कोटी (रुपये सतरा कोटी फक्त) आणि राज्य हिस्याचा ₹ ११.३३ कोटी निधी (रुपये अकरा कोटी तेहतीस लाख फक्त) सन २०१८-१९ करिता पुढील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा -

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जाती** | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (२९) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६० टक्के)<br>(२४०१ A७२६) ३३-अर्थसहाय्य | **मागणी क्रमांक डी -३**<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (७८९) अनुसूचित जाती उपयोजना<br>(००) (३०) कृषि उन्नती योजना - राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत अर्थसहाय्य<br>(पंचवार्षिक योजनेअंतर्गत योजना)<br>(राज्य हिस्सा ४० टक्के)<br>(२४०१ A७३५) ३३-अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेल्या ₹ २८.३३ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण

अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे .

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध झालेली ₹ २८.३३ कोटी रक्कम कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) मध्ये जमा करावा आणि तद्नंतर सदर निधी संबंधित प्रकल्पांच्या अंमलबजावणीसाठी विविध अंमलबजावणी यंत्रणांना PFMS प्रणालीद्वारे वितरीत करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता पुढील अंमलबजावणी यंत्रणांना ₹ २८.३३ कोटी निधीपैकी सद्यस्थितीत ₹ १८.१७ कोटी (रुपये अठरा कोटी सतरा लाख) निधीचे प्रकल्प निहाय वितरण करण्यात येत असून, उर्वरित ₹ १०.१६ कोटी निधीचे प्रकल्प निहाय वितरण यथावकाश कळविण्यात येईल. त्यानुषंगाने, पुढील विभागांच्या अधिनस्त अंमलबजावणी यंत्रणांना ₹ १८.१७ कोटी निधी वितरीत करण्यात येत असून त्याबाबतचा प्रकल्प निहाय तपशिल या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट अ मध्ये नमूद केला आहे व त्याचा गोषवारा पुढीलप्रमाणे :-

**(रक्कम ₹ कोटी)**

| अ.क्र. | वितरीत निधीचा अंमलबजावणी यंत्रणानिहाय तपशील | वितरीत निधी |
|---|---|---|
| १ | आयुक्त (कृषि) | १२.३४ |
| २ | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ | ३.७७ |
| ३ | आयुक्त (पशुसंवर्धन) | २.०६ |
| | **एकूण** | **१८.१७** |

६. या शासन निर्णयान्वये केवळ ‘अनुसूचित जाती प्रवर्गाकरिता’ निधी वितरीत करण्यात आला असून त्याचा विविध मंजूर प्रकल्पांतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी विनियोग करावा

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२.०४.२०१८ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान केलेल्या अधिकारांनुसार, आणि सामाजिक न्याय विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८३/विघयो, दि.०५ जून, २०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५६/२०१८/व्यय-१, दि. ०४, जुलै, २०१८ अन्वये, सन २०१७-१८ मधील अखर्चीत निधी पुनर्जिवित करुन चालू वर्षाकरिता खर्च करण्यास दिलेल्या मंजूरीच्या अनुषंगाने व त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१९१६४७३१०४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र : परिशिष्ट -अ**

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2018.07.19 17:14:28 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
२. मा.मंत्री (कृषि व फलोत्पादन), मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा/ विधान परिषद, विधान भवन, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा. संसद सदस्य/महाराष्ट्र विधानसभा सदस्य/महाराष्ट्र विधानपरिषद सदस्य
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
७. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१३.संचालक (प्रक्रिया व नियोजन), कृषि आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१४.महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१७.सहायक संचालक (लेखा-१), कृषिआयुक्तालय, पुणे
१८. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१९.निवड नस्ती.

परिशिष्ट - अ

कृषी, पशुसंवधन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

शासन निर्णय क्र. राकृवि-०८१७/प्र.क्र.९४/राकृवियो कक्ष, दि.१९/०७/२०१८ चे सहपत्र

वर्ष- २०१८-१९ (रक्कम ₹ कोटी)

| अ. क्र. | प्रकल्पाचे नांव व अंमलबजावणी यंत्रणा | प्रकल्प मंजूरीचे वर्ष | प्रकल्पांची मंजूर / उर्वरित प्रकल्प किंमत (नवीन / जुने प्रकल्प) | यापूर्वी वितरित निधी | चालू वर्षीच्या निधी वितरणानंतर शिल्लक राहिलेली प्रकल्प किंमत (सर्वसाधारण + अजा+अज) | या शासन निर्णयान्वये अनुसूचीत जाती प्रवर्गारिता वितरित करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | उन्नत शेती - समृद्ध शेतकरी मोहिम अंतर्गत यांत्रिकीकरण प्रकल्प | २०१७-१८ | १५२.७६ | १४०.४२ | १२.३४ | १२.३४ |
| | **संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण)** | **एकूण** | **१५२.७६** | **१४०.४२** | **१२.३४** | **१२.३४** |
| | **आयुक्त (कृषि)** | **एकूण** | **१५२.७६** | **१४०.४२** | **१२.३४** | **१२.३४** |
| २ | वखार महामंडळाच्या राज्यातील गोदामांच्या फरश्यांची दुरुस्ती दर्जा सुधारणे आणि गडचिरोली, भंडारा, गोंदिया व चंद्रपूर जिल्हयातील वखार महामंडळांच्या वखार केंद्रांवर सिमेंट रस्त्यांची निर्मिती | २०१७-१८ | २३.९९ | २०.७३ | ३.२६ | २.४७ |
| ३ | राज्यातील १० ठिकाणी गोदामांची निर्मिती करुन तेथे वखार पावती सुविधा व ऑनलाईन ट्रेडींग सुविधा उपलब्ध करुन देणे | २०१७-१८ | १२.३२ | ९.८८ | २.४४ | १.३० |
| | **व्यवस्थापकीय संचालक (वखार महामंडळ)** | | **३६.३१** | ३०.६१ | ५.७० | **३.७७** |
| ४ | लोकमंगल मल्टीस्टेट सहकारी संस्था, बीबी दारफळ जि. सोलापूर यांचा दूध प्रक्रिया प्रकल्पाची १ LLPD क्षमतावाढ व दुध भुकटी प्रकल्प उभारणी | २०१७-१८ | **१२.४०** | **५.००** | ७.४० | **१.२६** |
| ५ | संपतराव देशमुख सह. दूध संघ, कडेपूर जि सांगली यांच्या ५० TLPD दूध प्रक्रिया प्रकल्पाची १ LLPD क्षमतावाढ करणे तसेच, दोन शितकरण केंद्रांची (१० TLPD) उभारणी. | २०१७-१८ | **७.७३** | **३.००** | ४.७३ | **०.८०** |
| | **आयुक्त (दुग्धव्यवसाय)** | | **२०.१३** | **८.००** | **१२.१३** | **२.०६** |
| | **एकूण** | | **२०९.२०** | **१७९.०३** | **३०.१७** | **१८.१७** |